समग्र शिक्षा अंतर्गत कार्यरत विशेष शिक्षकांच्या मानधनाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एसएसए-२०१८/प्र.क्र.२८३/एस.डी.-१**
मादाम कामा मार्ग हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: १० डिसेंबर, २०२१

वाचा :-

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.एसएसए-२०१८/ प्र.क्र.२८३/एस.डी.-१, दिनांक ०२ ऑगस्ट, २०१९

२) महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांचे पत्र क्र.मप्राशिप/समग्र शिक्षा/IE/मा.फ. /२०२१-२२/३००८, दिनांक ०८/१०/२०२१.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६/०४/२०२१

४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४/०६/२०२१

५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२९/०७/२०२१

प्रस्तावना:-

समग्र शिक्षाअंतर्गत अपंग समावेशित शिक्षण उपक्रमातील (प्राथमिक स्तर) विशेष शिक्षकांना सन २०१७-१८ या वर्षात रु.२१,५००/- प्रतिमाह इतके मानधन मंजूर होते. तथापि, समग्र शिक्षाच्या सुधारित आराखडयानुसार या विशेष शिक्षकांचे मानधन सन २०१८-१९ या शैक्षणिक वर्षापासून रु.२०,०००/- प्रतिमाह च्या मर्यादेत निश्चित करण्यात आले आहे. या विशेष शिक्षकांना रु.१,५००/- प्रतिमाह इतके मानधन कमी मिळत आहे. त्यामुळे रु.१,५००/- प्रतिमाह इतकी फरकाची रक्कम राज्य निधीमधून देण्याचा व यासाठी एकूण रु.३५०.२८ लक्ष इतका निधी दरवर्षी राज्य हिश्याच्या प्रमाणाबाहेर उपलब्ध करुन देण्याबाबतचा प्रस्ताव मा.मंत्रीमंडळासमोर सादर करण्यात आला होता. मा.मंत्रीमंडळाने दि.१६ जुलै, २०१९ रोजी सदर प्रस्तावास मंजूरी दिली आहे.

मा.मंत्रीमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने शासन निर्णय दिनांक ०२ ऑगस्ट, २०१९ अन्वये समग्र शिक्षा अंतर्गत समावेशित शिक्षण उपक्रमातील (प्राथमिक स्तर) कार्यरत १९४६ विशेष शिक्षकांना रु.२१,५००/- प्रतिमाह याप्रमाणे मानधन मंजूर करण्यास तसेच प्रति शिक्षक रु.१,५००/- प्रतिमाह इतकी फरकाची रक्कम राज्य निधीमधून देण्यासाठी एकूण रु.३५०.२८ लक्ष इतका निधी दरवर्षी राज्य हिश्श्याच्या प्रमाणाबाहेर उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आली आहे.

महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांनी दि.८ ऑक्टोबर, २०२१ रोजीच्या पत्रान्वये सन सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षातील प्रति शिक्षक रु.१,५००/- प्रतिमहा याप्रमाणे कार्यरत १७८६ विशेष शिक्षकांच्या फरकाची रक्कम अदा करण्यासाठी रु.३,२१,४८,०००/- इतका निधी वितरीत करण्याची विनंती केली आहे. त्यास अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबतचा शासन निर्णय खालीलप्रमाणे आहे.

## शासन निर्णय :-

समग्र शिक्षा अंतर्गत समावेशित शिक्षण उपक्रमातील (प्राथमिक स्तर) कार्यरत १७८६ विशेष शिक्षकांना सन २०२१-२२ या शैक्षणिक वर्षातील मानधनातील फरकाची रक्कम प्रति शिक्षक रु.१,५००/- प्रतिमहा याप्रमाणे वितरीत करण्यासाठी रु.३,२१,४८,०००/- (रुपये तीन कोटी एकवीस लाख अठ्ठेचाळीस हजार फक्त) इतका निधी राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई यांना वितरीत करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात "मागणी क्रमांक ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१ प्राथमिक शिक्षण, १०६-शिक्षक व इतर खर्च, (०१) समग्र शिक्षा अभियान, (०१) (०२) समग्र शिक्षा अभियान (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर), (२२०२ I६१२)" या लेखाशिर्षाखाली रुपये ५२४.३३२७ कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर लेखाशिर्षामधून यावर होणारा खर्च भागविण्यात यावा.

३. सदर खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०६/०४/२०२१ चे परिपत्रक, दि.२४/०६/२०२१ व दि.२९/०७/२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील सूचनांनुसार करण्यात यावा. सदर निधी आहरीत करुन वितरीत करण्यासाठी अवर सचिव / कक्ष अधिकारी (लेखा शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "आहरण व संवितरण अधिकारी" तर सह सचिव / उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय यांना "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या दि.०२/०८/२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.३२९/१४७१, दि.१०/११/२०२१ तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१०६०/२०२१/व्यय-५, दि.२४/११/२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२१०१४४५०८५१२१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gaikwad Santosh Umeshrao

Digitally signed by Gaikwad Santosh Umeshrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education & Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1d60828c41033ab1da6d64ef17879745d578b334c05c1e8151ef933f134060bc, serialNumber=bc8833f9e213a7e4dfb9d2b071c9202ea52a04054e53b0c1bbf9e50c90a2cf5c, cn=Gaikwad Santosh Umeshrao
Date: 2021.12.10 14:45:53 +05'30'

**(संतोष गायकवाड)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा/ विधान परिषद), विधानभवन, मुंबई.
४. सर्व मा. विधानसभा सदस्य/ विधान परिषद सदस्य, विधानभवन, मुंबई.
५. मा.अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. मा.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मा.अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. उप सचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी, सर्व जिल्हा परिषदा.
११.राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
१२.मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
१३.मा.राज्यमंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
१४.महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२ मुंबई, नागपूर
१५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
१६.संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई - ६३
१७. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे
१८. शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), शिक्षण संचालनालय, पुणे .
१९. शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
२०. शिक्षण संचालक, अल्पसंख्याक व प्रौढ शिक्षण संचालनालय, पुणे
२१.विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व)
२२.शिक्षणाधिकारी सर्व(माध्यमिक, प्राथमिक, निरंतर)
२३.अवर सचिव / कक्ष अधिकारी (लेखा शाखा/अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४.निवड नस्ती, एस.डी. १